**मंत्रालयीन कामकाजाची वेळ लवचिक करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र.क्र.८०/१८ (र. व का.)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३१ डिसेंबर २०१४

**वाचा :**

1) **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-समय-१०८८/१९/अठरा (र. व का.), दिनांक ३१.८.१९८८.**
2) **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-समय-१०९२/प्र.क्र.५३/अठरा (र. व का.), दिनांक ३१.१०.१९९२.**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-समय-१०८८/१९/अठरा(र.व.का.), दिनांक ३१.८.१९८८ अन्वये दि.१.९.१९८८ पासून बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयांची वेळ सोमवार ते शनिवार सकाळी ९.४५ ते सायंकाळी ५.३० पर्यंत करण्यात आली आहे. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक समय-१०९२/प्र.क्र.५३/१८(र. व का.), दिनांक ३१.१०.१९९२ अन्वये शासकीय कर्मचा-यांना सकाळी कार्यालयात हजेरी नोंदविण्यासाठी १० मिनिटांचा “ग्रेस पिरीयड” देण्यात आलेला आहे. या १० मिनिटांचा ग्रेस पिरीयड संपल्यानंतर शासकीय कर्मचारी उशिरा आल्यास २ उशिरानंतर तिस-या उशिरास त्याची नैमित्तिक रजा कापण्याची तरतूद करण्यात आली आहे. मंत्रालयातील बहुतांश अधिकारी/कर्मचारी दूरच्या अंतरावरून रेल्वेने कार्यालयात येतात. परिणामी शासकीय कर्मचा-यांना मंत्रालयात पोहोचण्यास उशिर होतो असे निदर्शनास येत असते. या परिस्थितीत मंत्रालयीन अधिकारी/कर्मचारी यांना सकाळी कार्यालयात येण्यासाठी कार्यालयीन वेळेत लवचिकतेची सवलत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

शासनाने मंत्रालयीन अधिकारी/ कर्मचारी यांच्या कार्यालयीन उपस्थितीबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

(i) दिनांक १ जानेवारी, २०१५ पासून मंत्रालयीन शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना सकाळी कार्यालयात उपस्थिती नोंदविण्यासाठी ६० मिनिटांच्या लवचिकतेची सवलत देण्यात येत आहे.

(ii) अधिकारी/कर्मचारी सकाळी ९.४५ ते १०.४५ या कालावधीत जितकी मिनिटे उशिरा येईल तितकी मिनिटे सायंकाळी ५.३० नंतर जास्त वेळ कार्यालयात थांबून काम करणे आवश्यक राहील.

(iii) ज्या वेळेस वरिष्ठ अधिकारी दुस-या दिवशी सकाळी लवकर किंवा ९.४५ वाजता कार्यालयात येण्याच्या सूचना देतील तेंव्हा त्या सूचना संबंधित अधिकारी/कर्मचा-याने पाळणे बंधनकारक राहील.

(iv) प्रत्येक शासकीय अधिकारी/कर्मचा-याने दररोज भोजनाची वेळ धरून ७.४५ तास काम करावे. तथापि कामकाजाचे महत्त्व विचारात घेऊन (जसे विधानमंडळ कामकाज, न्यायालयीन प्रकरणे इत्यादी) शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांनी आवश्यकतेनुसार कार्यालयीन वेळेनंतर थांबणे बंधनकारक राहील.

वरील निर्णयाच्या अनुषंगाने मंत्रालयातील कार्यालय सकाळी वेळेवर उघडणे व सायंकाळी बंद करणे या संबंधीची व्यवस्था करण्याकरिता योग्य ते आदेश मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने निर्गमित करावेत.

वरील सवलतीमुळे शासकीय कामकाजात कोणतीही गैरसोय होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२३११६०२१६७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Tryambakrao Nalawade

Digitally signed by Pramod Tryambakrao Nalawade
DN: c=IN, o=All India Services, ou=IAS, postalCode=110001, st=New Delhi, cn=Pramod Tryambakrao Nalawade
Date: 2014.12.31 16:15:46 +05'30'

**प्रमोद त्र्यंबकराव नलावडे**
**सचिव (प्र.सु. र. व का.)**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
३. मा. राज्यपालांचे सचिव
४. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक,
६. शासनाचे मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,
७. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय मुंबई
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१०.निवड नस्ती (कार्यासन १८)